**महाप्रित संस्थेच्या सांगली जिल्हयातील नियोजित १२५ मेगावॅट क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्प उभारण्यासाठी समिती व उपसमिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सौरप्र-२०२१/प्र.क्र.२६७/ ऊर्जा-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १७ फेब्रुवारी, २०२२

संदर्भ: १) व्यवस्थापकीय संचालक, महाप्रित, मुंबई यांचा दि. १३ डिसेंबर, २०२१ रोजीचा प्रस्ताव.
२) मा.मंत्री (ऊर्जा) महोदय यांच्या अध्यक्षतेखाली दि. १६ डिसेंबर,२०२१ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

व्यवस्थापकीय संचालक, महाप्रित यांनी दि. १३ डिसेंबर, २०२१ रोजी महाप्रित संस्थेव्दारे सांगली जिल्हयातील नियोजित १२५ मेगावॅट क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्प उभारण्याबाबत शासनास प्रस्ताव सादर केला. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने मा. मंत्री (ऊर्जा) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१६ डिसेंबर, २०२१ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीत मा. मंत्री (ऊर्जा) यांनी महाप्रित संस्थेच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने प्रधान सचिव (ऊर्जा) यांच्या अध्यक्षतेखाली सर्व संबंधितांची समिती गठीत करण्यात यावी. सदर समितीस निर्णय घेणे सुकर होण्यासाठी संचालक (वाणिज्य), महावितरण कंपनी यांच्या अध्यक्षतेखाली सर्व संबंधित संचालक यांची उपसमिती गठीत करण्यात यावी. सदर उपसमितीने महाप्रित संस्थेच्या प्रस्तावाबाबत सर्वांगाने विचार करुन त्यांचा अहवाल समितीस सादर करावा व समितीने सदर अहवालाच्या अनुषंगाने आवश्यक ती शिफारस शासनास करावी, असे निदेश दिले.

मा.मंत्री (ऊर्जा) यांच्या उक्त निदेशाच्या अनुषंगाने महाप्रित संस्थेच्या सांगली जिल्हयातील नियोजित १२५ मेगावॅट क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्प उभारण्याबाबत समिती व उपसमिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाप्रित संस्थेच्या सांगली जिल्हयातील नियोजित १२५ मेगावॅट क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्प उभारण्याबाबत खालीलप्रमाणे समिती व उपसमिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर समिती व उपसमिती खालीलप्रमाणे राहील:-

**अ) प्रधान सचिव (ऊर्जा) यांच्या अध्यक्षतेखालील समिती:-**

**समितीचे सदस्य:-**

| | |
|---|---|
| प्रधान सचिव (ऊर्जा) | - अध्यक्ष |
| अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महावितरण कंपनी | - सदस्य |
| अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महापारेषण कंपनी | - सदस्य |
| महासंचालक, महाऊर्जा | - सदस्य |
| अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाप्रित | - सदस्य |
| संचालक (वाणिज्य), महावितरण कंपनी | - विशेष आमंत्रित |
| उप सचिव (ऊर्जा-७), उ.ऊ.व का.वि. | - सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :-**

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील-

१) उपसमितीने सादर केलेल्या प्रस्तावाची छाननी / तपासणी करुन त्यावर पुढील कार्यवाहीची शिफारस करणे.

२) नियामक बाबींचा विचार करुन प्रकल्पातून निर्मित वीजेसंदर्भात महावितरण कंपनी सोबत वीज खरेदी कराराचा विचार करणे / शिफारस करणे. अशा वीज दराचा विचार करताना प्रकल्पाचे सामाजिक व इतर पैलू विचारात घेणे.

३) प्रकल्प जलदगतीने उभारण्याच्या दृष्टीने इतर अनुषंगिक / संलग्न विषयाबाबत शिफारस करणे/मदत करणे.

**समितीचा कालावधी :-**

सदर समिती उपरोक्त नियोजित १२५ मेगावॅट क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित होईपर्यंत अस्तित्वात राहील.

**ब) संचालक (वाणिज्य), महावितरण कंपनी यांच्या अध्यक्षतेखालील उपसमिती :-**

**समितीचे सदस्य :-**

| | |
|---|---|
| संचालक (वाणिज्य), महावितरण कंपनी | - अध्यक्ष |
| संचालक (संचलन), महावितरण कंपनी | - सदस्य |
| संचालक (संचलन), महापारेषण कंपनी | - सदस्य |
| संचालक (संचलन), महानिर्मिती कंपनी | - सदस्य |
| महासंचालक, महाऊर्जा | - सदस्य |
| मुख्य अभियंता, राज्य पारेषण उपक्रम | - सदस्य |
| संचालक (संचलन), महाप्रित | - सदस्य |
| तांत्रिक सल्लागार, महाप्रित | - सदस्य |
| मुख्य अभियंता (अपारंपारिक ऊर्जा), महावितरण कंपनी | - सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :-**

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील-

१) प्रकल्पाच्या तांत्रिक, नियामक आणि वाणिज्य पैलूवर अभ्यास करुन शिफारशी करणे.

२) प्रकल्पाच्या वीज खरेदी करारासाठी (PPA) दरासंदर्भात शिफारस करणे. अशा वीज दराची शिफारस करताना प्रकल्पाचे सामाजिक व इतर पैलू समितीने विचारात घ्यावेत.

३) प्रकल्प आस्थापित करण्यासाठी आवश्यक पायाभूत सुविधा, निष्कासन व्यवस्था व अतिरिक्त क्षमता आणि आवश्यकतेनुसार निष्कासन व्यवस्था / उपकेंद्र यांचे योग्य त्या स्तरावर स्थलांतर / उभारणीसंदर्भात शिफारस करणे.

४) प्रकल्पाचे संभाव्य सामाजिक / आर्थिक लाभासंदर्भात अभ्यासपूर्ण अहवाल सादर करणे.

५) प्रकल्प जलदगतीने उभारण्याच्या दृष्टीने इतर अनुषंगिक / संलग्न विषयाबाबत शिफारस करणे.

महाप्रित संस्थेच्या सांगली जिल्हयातील नियोजित १२५ मेगावॅट क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्पाबाबत सर्वांगाने (तांत्रिक/ आर्थिक व्यवहार्यता, पायाभुत सुविधा, निष्कासन व्यवस्था, वीजदर/ वीज खरेदी करार इत्यादी) विचार करुन त्यांचा अहवाल प्रधान सचिव (ऊर्जा) यांच्या अध्यक्षतेखालील समितीस/ १ महिन्यात सादर करेल.

**समितीचा कालावधी** :-

सदर उपसमिती उपरोक्त नियोजित १२५ मेगावॅट क्षमतेचा सौर ऊर्जा प्रकल्प कार्यान्वित होईपर्यंत अस्तित्वात राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२१७१६२५०४३२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2022.02.17 16:28:16 +05'30'

**(नानासाहेब ढाणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मंत्री (ऊर्जा), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य), मंत्रालय, मुंबई.
६) मा.राज्यमंत्री (ऊर्जा), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७) मा.राज्यमंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य), मंत्रालय, मुंबई.
८) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) प्रधान सचिव, (ऊर्जा), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
१४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
१५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
१६) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
१७) व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळ (महाप्रित), जुहू, मुंबई-४०००४९.
१८) अवर सचिव (ऊर्जा-४) व कक्ष अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.